"नव्याने स्थापन केलेल्या नगरपालिकांना नागरी सुविधा पुरविण्यासाठी सहाय्य" योजनेअंतर्गत नगरपालिकांना निधी वितरीत करण्याबाबत.

सन २०१८-२०१९ साठी लेखाशिर्ष (२२१७ ९५०९) रू.३३.५० कोटी

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक-ननपा-२०१८/प्र.क्र.१५०/नवि-१६
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३ आक्टोंबर,२०१८.

वाचा :-

(१)नगर विकास विभाग,शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१२/प्र.क्र.२७/नवि-१६,दिनांक २७ जून,२०१२.

(२)नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१२/प्र.क्र.२७/नवि-१६, दिनांक १५ एप्रिल,२०१३.

(३)नगर विकास विभाग,शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.९७/नवि-१६ दिनांक १२ एप्रिल,२०१६.

(४)शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६ /नवि-१६, दिनांक ३ ऑगस्ट,२०१६.

(५) नगर विकास विभाग,शासन निर्णय क्र. धोरण-२०१७/प्र.क्र.६२/नवि-१६ दिनांक १५ मार्च,२०१७.

(६) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३,दिनांक २ एप्रिल,२०१८.

प्रस्तावना :-

नव्याने स्थापन केलेल्या नगरपालिकांना नागरी सुविधा पुरविण्यासाठी सहाय्यक अनुदान देण्यात येते. सदर योजनेचे निकष संदर्भाधीन क्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेले आहेत. संदर्भाधीन क्र. (२) ते (५) अन्वये नगर विकास विभागाने वेळोवेळी दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार तसेच, संदर्भाधीन

क्र (६) येथील वित्त विभागाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार "नव्याने स्थापन केलेल्या नगरपालिकांना नागरी सुविधा पुरविण्यासाठी सहाय्य" या योजनेअंतर्गत राज्यातील नगरपालिकांना "अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर" निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"नव्याने स्थापन केलेल्या नगरपालिकांना नागरी सुविधा पुरविण्यासाठी सहाय्य" योजनेअंतर्गत राज्यातील नगरपालिकांना विशेष अनुदान **एकूण रक्कम रू. ३३,५०,००,०००/- (अक्षरी रक्कम रूपये तेहतीस कोटी पन्नास लक्ष मात्र)** इतका निधी वितरीत करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर प्रकल्प खर्चाचा १००% हिस्सा राज्य शासनाचा राहणार आहे. त्यामुळे सदर प्रकल्पाअंतर्गत निश्चित करण्यात आलेल्या कामांना मंजूर रकमेच्या मर्यादेत सक्षम प्राधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मान्यता संदर्भाधीन क्रमांक (१) ते (५) येथील शासन निर्णयान्वये प्राप्त करून घ्यावी.

३. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांच्या सल्ल्याने प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार (PMC) नियुक्त करण्याच्या अटीवर कार्यान्वयन यंत्रणा नगरपरिषद राहील अथवा कार्यान्वयन यंत्रणा सार्वजनिक बांधकाम विभाग राहील. सदर योजनेअंतर्गत निधी वितरीत करावयाच्या नगरपरिषदांबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

४. सदर प्रकल्पाअंतर्गतच्या कामांच्या "ई-निविदा" अंती प्रकल्प खर्च निश्चित करण्यात यावा. सदरचा प्रकल्प खर्च हा तांत्रिक व प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या प्रकल्प खर्चापेक्षा जास्तीचा असल्यास, अशा जास्तीच्या खर्चासाठी कुठल्याही स्वरुपात अतिरिक्त अनुदान शासनाकडून उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

५. प्रत्येक काम हे ई-निविदा पद्धतीनेच व किमान रू.१० लक्षचे करणे बंधनकारक असून, प्रशासकीय मान्यतेच्या किंमतीचे पुनश्च विलगीकरण (Splitting) करून

कार्यादेश देणे ही गंभीर अनियमितता समजण्यात येईल व याची जबाबदारी संबधित जिल्हाधिकारी यांची राहील.

६. सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात येणारी कामे अन्य कोणत्याही योजनेतून अथवा स्व: उत्पन्नातून होत नाहीत याची खातरजमा संबधित जिल्हाधिकारी यांनी करून घ्यावी. कोणत्याही परिस्थितीत कामांची दुरूक्ती होणार नाही याची दक्षता जिल्हाधिकारी यांनी घ्यावी.

७. "ई-निविदा" अंतीचा प्रकल्प खर्च हा तांत्रिक व प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या प्रकल्प खर्चापेक्षा कमी असल्यास, सदर कमी झालेल्या खर्चाच्या राज्य शासन हिस्स्याची रक्कम शासनास जमा करावी. सदरची जबाबदारी आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील. सदर योजनेअंतर्गत घ्यावयाची कामे ही यापूर्वी संदर्भाधीन क्र. (३) येथील शासन निर्णयानुसारच असतील व सर्व कामे ई- निविदा पद्धतीने होतील याची जबाबदारी संबधित मुख्यधिकारी यांची राहील.

८. जिल्हाधिकारी, यांची जबाबदारी खालीलप्रमाणे राहील:-

(अ) सदर प्रकल्पाअंतर्गतची कामे ही सार्वजनिक मालकीच्या ठिकाणीच करावीत, कामाचे स्वरुप सार्वजनिक असावे, तसेच त्यामुळे सर्वसमावेशक नागरिकांच्या प्राथमिक सोयी सुविधांमध्ये भर पडणार आहे याची पुन्हा खातरजमा करणे व कुठल्याही खाजगी स्वरुपाच्या कामांना मान्यता देण्यात आली नसल्याची खातरजमा करणे.

(ब) सदर प्रकल्पाअंतर्गतची कामे सबंधित शहराच्या विकास नियंत्रण नियमावली व विकास आराखडयाशी सुसंगत असल्याची खातरजमा करणे.

(क) सदर प्रकल्पाअंतर्गतच्या कामांना "ई-निविदा" कार्यप्रणालीचा अवलंब करणे बंधनकारक राहील.याबाबत सार्वजनिक बांधकाम विभाग तसेच शासनाने निर्गमित केलेल्या अद्यावत मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. "ई-निविदा" कार्यप्रणालीचा अवलंब करण्यात येत असल्याची खातरजमा करणे.

(ड) सदर प्रकल्पाअंतर्गत उपलब्ध करून दिलेला निधी त्याच उद्दिष्टासाठी खर्च करण्यात येत असल्याचे, काम गुणवत्तेनुसार झाले आहे किंवा कसे तसेच मंजूर कामावरच मंजूर निधी खर्च झाला आहे किंवा कसे हे पाहणे.तसेच दर सहा महिन्यांनी जिल्ह्याअंतर्गत या योजनेखाली हाती घेण्यात आलेल्या कामांचा आढावा घेणे.

(इ) सदर प्रकल्पाअंतर्गतच्या कामावर करण्यात येणा-या खर्चामुळे आदर्श आचारसंहितेचा भंग होणार नाही हे पाहणे.

(ई) निधी खर्च करताना तो विहीत कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे व नियमांचे तसेच विहीत प्रक्रियेचे अवलंबन करण्यात यावे. निधी खर्च करण्याबाबत वित्त विभागाकडून वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयातील सूचनांचा व वित्तीय अधिकारांच्या मर्यादेचा (Financial Power) भंग होणार नाही तसेच, कुठल्याही शासन नियम/अधिकाराचा भंग होणार नाही हे पाहणे.

(फ) सदर योजनेअंतर्गत करण्यात येणा-या रस्त्यांच्या कामांना इतर कोणत्याही योजनेमधून प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली नाही अथवा सदरची कामे करण्यात आलेली नाही याची खातरजमा जिल्हाधिकारी यांनी करावी.

(ग) पाणीपुरवठा व मलनिस्सारणाच्या प्रकल्पामुळे प्रस्तावित रस्त्यांचे उत्खनन होणार नाही अशाप्रकारे कामांचे नियोजन करावे.प्रस्तावित रस्त्यांच्या ठीकाणांवरील पाणीपुरवठा व मलनिस्सारण प्रकल्पाची कामे पूर्ण झाल्यानंतरच सदर रस्त्यांची कामे होतील याची खातरजमा जिल्हाधिकारी यांनी करावी.संदर्भाधीन क्र. (५) च्या शासन निर्णयामधील अटी व शर्थीचे पालन करण्यात यावे.

(च) कामाच्या चुकीच्या नियोजनामुळे पाणीपुरवठा व मलनिस्सारणाच्या प्रकल्पामुळे नव्याने करण्यात येणा-या रस्त्यांचे उत्खनन होऊन निधीचा अपव्यय होणार नाही यावर नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी यांची राहील.

९. कार्यान्वयन यंत्रणेची जबाबदारी खालीलप्रमाणे राहील:-

(अ) सदर प्रकल्पाअंतर्गत दुरूस्तीची तथा परिरक्षणाची कामे हाती घेण्यात येत नाहीत हे पाहणे.

(ब) सदर प्रकल्पाअंतर्गतची कामे सुरू करण्यापुर्वीच्या स्थितीचे व काम झाल्यानंतरच्या कामाचे चित्र (Photograph) काढून ठेवणे व मागणीनुसार सादर करणे.

(क) सदर प्रकल्पाअंतर्गतच्या कामांचे त्रयस्थ पक्षाकडून लेखापरिक्षण करून घेणे (Third Party Audit)कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

**१०.** यापूर्वी या योजनेखाली झालेल्या खर्चाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे व सदर शासन निर्णयान्वये उपलब्ध करून दिलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित प्रपत्रात संबधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेकडून उपलब्ध करून घेऊन,

संबंधित महालेखापाल कार्यालयाकडे सादर करण्याची जबाबदारी संबधित जिल्हाधिकारी यांची राहील.तसेच, उपयोगिता प्रमाणपत्राची एक प्रत आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांचेकडे सादर करावी.

**११.** दिनांक ३१ मार्च २०२० अखेर ही निधी खर्च करण्याची मुदत संपल्यानंतर आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांनी या लेखाशिर्षाखाली सन २०१८-२०१९ करीता वितरीत करण्यात येणा-या सर्व निधीच्या उपयोगिताचे प्रमाणपत्र प्राप्त करून घ्यावे. सदरची उपयोगिताचे प्रमाणपत्र एकत्रितरीत्या संबंधित महालेखापाल कार्यालयाकडे सादर करून खर्चित व अखर्चित निधीचा अहवाल शासनास सादर करावा.

**१२.** या शासन निर्णयानुसार मंजूर व वितरीत करण्यात येत असलेल्या निधीचे कार्यान्वयन यंत्रणेस वितरण करण्यासाठी संबधित जिल्हाधिकारी यांना नियंत्रक अधिकारी तसेच, संबधित जिल्हा प्रशासन अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. संदर्भाधीन क्र. (१) ते (५) येथील शासन निर्णयान्वये "नव्याने स्थापन केलेल्या नगरपालिकांना नागरी सुविधा पुरविण्यासाठी सहाय्य" या योजनेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून, सदर शासन निर्णयातील सर्व अटी व शर्ती बंधनकारक राहतील. सदरच्या अटी व शर्तीची पुर्तता व प्रकल्पास सक्षम प्राधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्याची खातरजमा करण्यात यावी.

**१३.** या शासन निर्णयान्वये निधी वितरीत करावयाच्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना या लेखाशिर्षाखाली सन २०१६-२०१७ करीता वितरीत केलेल्या निधीपैकी १००% खर्चाचे विनियोग झाले असल्याची खातरजमा आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावी व असे उपयोगिता प्रमाणपत्र देयकासोबत जिल्हा कोषागारात सादर करावे.या लेखाशिर्षाखाली यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक / महालेखापाल यांच्याकडून कोणतेही गंभीर आक्षेप नाहीत याची खातरजमा आहरण व संवितरण अधिका-याने करावी.असे गंभीर आक्षेप असल्यास निधी आहरीत करू नये.

**१४.** या लेखाशिर्षाखाली एक वर्षावरील जुने संक्षिप्त देयक प्रलंबित असल्यास निधी आहरीत करू नये.असे प्रस्ताव वित्त विभागाची सहमती घेण्यासाठी नगर विकास विभागाकडे पाठविण्यात यावेत.

**१५.** आहरण व संवितरण अधिका-याने सदरचे आहरीत करण्यात येणारे अनुदान तात्काळ संबधितास वितरीत करावे. सदरचे अनुदान दिनांक ३१ मार्च २०२० अखेर खर्ची पडेल याची दक्षता घ्यावी. दिनांक ३१ मार्च २०२० अखेरचा अखर्चित निधी संबधितांनी व्याजासह शासनाच्या खाती तात्काळ जमा करावा.

**१६.** राज्य शासनाकडून मंजूर करण्यात आलेला निधी संबधित कार्यान्वयन यंत्रणा यांना **कोणत्याही प्रकारची कपात न करता** वितरीत करण्यात यावा.सदरचा निधी जिल्हाधिकारी यांनी थेट वळता करू नये.

**१७.** या शासन निर्णयान्वये निधी वितरीत करावयाच्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडे या लेखाशिर्षाखाली यापुर्वी वितरीत केलेला निधी अखर्चित असल्यास, वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-१०१५/प्र.क्र.१८/अर्थोपाय दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ व शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-१०.०२/प्र.क्र.१२८/अर्थोपाय दिनांक ६ जून,२००८ अन्वये २००८ तसेच, शासन निर्णय क्र. संकिर्ण-११९८/प्र.क्र.३३/न.वि.-४ , दि. १२.३.२०१८ व दि. ९.८.२०१८ अन्वये कार्यवाही करावी.

**१८.** वित्त विभागाचे शासन परिपत्रक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९ /अर्थ-३,दिनांक २० एप्रिल,२०१६ मधील सोबतच्या परिशिष्टाच्या अ.क्र. (९) मधील तपासणी सूचीतील लागू होत असलेल्या बाबींची उपरोक्त परिच्छेदांनुसार पुर्तता करण्यात आली आहे.

**१९.** यासंबंधीचा खर्च मागणी क्र.एफ-२, मुख्य लेखाशिर्ष २२१७, नगर विकास, ८०, सर्वसाधारण, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, (००) (१२) नव्याने स्थापन केलेल्या नगरपालिका /नगरपरिषदांना नागरी सुविधा पुरविण्यासाठी सहाय्य, ३१ , सहायक अनुदाने (वेतनेतर) , (२२१७ ९५०९), या लेखाशिर्षाखाली सन २०१८-२०१९ मधील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

**२०.** वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/ अर्थ-३,दिनांक २ एप्रिल,२०१८ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदरचा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**२१.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००३१७४१०६८१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Shankar Kumbhar

Digitally signed by Vivek Shankar Kumbhar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ef935067970760fbaec2fa421af2eac23d3b8737b990883be0d8ef292ba28a2f, serialNumber=5e3716fd0fe61ee87305882bc35ee7e757293849e74351e2ab33e4eb40bfb646, cn=Vivek Shankar Kumbhar
Date: 2018.10.04 19:43:45 +05'30'

(विवेक कुंभार)

**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी, मुंबई-१८
३. सर्व विभागीय आयुक्त
४. सर्व जिल्हाधिकारी
५. मा.राज्यमंत्री (नगरविकास) यांचे खाजगी सचिव
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२. सर्व जिल्हा प्रशासन अधिकारी

१३. वित्त विभाग, व्यय-३/ कोषा प्रशासन-५/अर्थसं-१६/नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई.

१४. कार्यासन नवि-४ नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५. निवड नस्ती (नवि-१६), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.